**पेंच प्रकल्पाचे पाणी वापराच्या फेरनियोजनास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक : संकीर्ण २०२०/ (१०/२०२०)/सिं.व्य.(धोरण)**
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक :-१९/०३/२०२०.

**संदर्भ** :१) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचे जा.क्र. विपाविम /कांता ६(१) / पेंच फेर नियोजन /सुधारित /२०२०, दिनांक १५/०१/२०२०
२) महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई यांचे पत्रा क्र. ४३८, दिनांक ०३/०६/२०१९

**प्रस्तावना :**

पेंच प्रकल्पांतर्गत तोतलाडोह जलविद्युत प्रकल्प १९८९ मध्ये व नवेगांवखैरी धरण पेंच नदीवर १९७६ मध्ये तसेच खिंडसी धरण, सुर नदीवर १९०६ मध्ये पुर्ण झाले आहे. पेंच सिंचन प्रकल्पास शासन निर्णय क्र.. PIM २९६७/३८१४ IP (४) Sachivalaya Bombay दिनांक २१/०८/१९७२ अन्वये प्रशासकीय मान्यता प्राप्त आहे. मंजुर अहवालानुसार ९६५ दलघमी पाणी वापराचे जल नियोजन असून त्याप्रमाणे सिंचन ६८९ दलघमी, नागपूर महानगर पालिका ११२ दलघमी , कोराडी औष्णिक विद्युत केन्द्र ६७ दलघमी, खापरखेडा औष्णिक विद्युत केन्द्र ६० दलघमी, मत्स्य व्यवसाय २ दलघमी, सनफ्लॉग इंडस्ट्री, भंडारा २ दलघमी व बाष्पीभवन व्यय ३३ दलघमी असे एकुण ९६५ दलघमी वापराचे नियोजन आहे.

तोतलाडोह धरण स्थळी १९७६ ते २०१६ या ४० वर्षातील प्रत्यक्ष उपलब्ध येव्यानुसार तोतलाडोह धरणात ७५ टक्के विश्वासार्ह येवा ११५७.८० दलघमी आहे. तथापि, पेंच प्रकल्पाचे नियोजनात दर्शविलेला ७५ % विश्वासार्ह येवा १७६०.९० दलघमी इतका आहे.

मध्यप्रदेश शासनाने पेंच नदीवर ५७७ दलघमी साठवण क्षमतेचे चौराई येथे धरण वांधले असून त्यात सन २०१६ पासून पाणीसाठा करण्यात येतआहे. पेंच प्रकल्पाच्या प्रकल्प अहवालात वार्षिक पर्जन्यमानावरून Strange’s Coefficient ने Runoff काढण्यात आलेला आहे. परंतु Runoff काढताना पाणलोट क्षेत्रात विविध प्रकल्प झाल्यामुळे, लाभक्षेत्र निर्माण झाल्यामुळे व नागरीकरणामुळे पाणलोट क्षेत्रातील येव्यात लक्षणिय घट झालेली असल्याने सदर पाणलोट क्षेत्र “Bad Cachment” मध्ये रुपांतरीत झालेले आहे. त्यामुळे पेंच प्रकल्पाच्या येव्यात तफावत दिसून येत आहे. त्यामुळे तोतलाडोह धरणाच्या येव्यात लक्षणीय तूट निर्माण झाली आहे. तसेच पेंच प्रकल्पाचे मंजुर नियोजनातील बाष्पीभवन व्यय ३३ दलघमी असून प्रत्यक्षात निर्दशनास आलेला बाप्पीभवन व्यय १३२ दलघमी इतका आहे. त्यामुळे प्रेंच प्रकल्पाच्या मंजूर पाणी नियोजनाप्रमाणे पाणी उपलब्ध होत नसल्याने सिंचनासाठी मंजूर नियोजनाप्रमाणे पाणी उपलब्ध होत नाही.

मध्यप्रदेशातील चौराई येथील धरणामुळे महाराष्ट्रातील पेंच प्रकल्पाच्या पाणी साठयात व सिंचनात झालेल्या घटीमुळे उध्दवलेल्या पाणीटंचाईवर मात करण्यासाठी करावयाच्या दुष्काळ निवारण उपाययोजनांना जलसंपदा विभाग , शासन निर्णय, दिनांक ३०/०५/२०१८ अन्वये पेंच प्रकल्पाचे लाभक्षेत्रात तातडीने करावयाच्या उपाययोजने अंतर्गत ९ उपसा सिंचन योजनांना तत्वत:

मान्यता देण्यात आली. या उपाय योजनांव्दारे त्वरीत लाभ मिळणे अपेक्षित आहे. तसेच लोहघोगरी बोगदा योजना ही दिर्घकालीन उपाययोजने अंतर्गत प्रस्तावित आहे. दिर्घकालिन उपाययोजनेतंर्गत लोहघोगरी बोगदा योजनेला जलसंपदा विभाग ,शासन निर्णय दिनांक १८/०९/२०१९ अन्वये दोन टप्प्यात करावयाच्या कामांना प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. या योजनांना पुर्ण होण्यासाठी लागणारा कालावधी व होणाऱ्या पाणी उपलब्धतेचा विचार करुन पेंच प्रकल्पाच्या पाणी वापराचे फेर नियोजन दोन टप्प्यात करण्याचे विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळाने प्रस्तावित केले आहे.

जलसंपदा विभाग , शासन निर्णय दिनांक ३०.५.२०१८ अन्वये तत्वत: मान्यता प्राप्त एकूण ९ उपसा सिंचन योजनांपैकी बिड चिचघाट उपसा सिंचन योजना, सिहोरा उपसा सिंचन योजना, माथनी उपसा सिंचन योजना व बाबदेव उपसा सिंचन योजना या योजनांना महसूल व वन विभाग , शासन निर्णय, दिनांक २६/०७/२०१९ अन्वये मदत व पुर्नवसन विभागाने प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे. तसेच चिचोली उपसा सिंचन योजना, हिंगणा उपसा सिंचन योजना व काटी खमारी उपसा सिंचन योजना या योजनांचे सविस्तर प्रकल्प अहवाल शासनास प्रशासकीय मान्यतेस्तव सादर झाले असुन सातही उपसा सिंचन योजनाचे प्रस्ताव महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरणाचे मान्यतेस्तव सादर आहेत.

उपरोक्त नमुद कारणांमुळे पेंच प्रकल्पाचे पाणीवापराच्या फेरनियोजनाचा ताळेबंद दोन टप्प्यामध्ये अंतिम करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांनी सादर केलेल्या पाणीवापराचे फेरनियोजन प्रस्तावानुसार **टप्पा १**- पेंच लाभक्षेत्रातील उपसा सिंचन योजना कार्यान्वित झालेनंतर व **टप्पा २**- पेंच लाभक्षेत्रातील उपसा सिंचन योजना व लोहघोगरी बोगदा योजना कार्यान्वित झाल्यानंतर अशा दोन टप्यातील पाणी वापराच्या फेरनियोजनास ताळेबंदास खालील प्रमाणे मान्यता देण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **घटक/तपशिल** | **मुळ प्रकल्पीय मंजुर पाणीवापर (दलघमी) (सन १९७१)** | **फेरनियोजन प्रमाणे पाणीवापर (दलघमी)** | |
|---|---|---|---|---|
| | | | **टप्पा १** | **टप्पा-२** |
| १. | सिंचन पाणीवापर | ६८९ | ५८४ | ६८५ |
| २. | नागपूर महानगरपालिका | ११२ | १९० | ३४१ |
| ३. | कोरडी औष्णिक विद्युत केंद्र | ६७ | १० | १० |
| ४. | खापरखेडा औष्णिक विद्युत केंद्र | ६० | १० | १० |
| ५. | मत्स्यव्यवसाय | २ | २ | २ |
| ६. | सनफ्लॉग इन्डस्ट्रीज, भंडारा | २ | - | - |
| ७. | इतर बिगर सिंचन वापर | - | ५ | ५ |
| ८. | जलाशयातील बाष्पीभवन व्यय | ३३ | १०१ | १३२ |
| ९. | जलाशयावरुन सिंचन योजना<br>१) सत्रापुर उपसा सिंचन योजना<br>२) पेंच उच्च पातळी उजवा कालवा | <br>०<br>० | <br>१५<br>५ | <br>१५<br>५ |
| | **एकुण** | **९६५** | **९२२** | **१२०५** |

२. उपरोक्त मान्यता देण्यात येत असलेले पेंच प्रकल्प पाणी वापर फेरनियोजन हे केंद्रीय जल आयोगाने दिनांक ०४/०५/२०१८ रोजीचे ज्ञापनाव्दारे स्थापित केलेल्या केंद्रीय जलआयोग, नवी दिल्ली, महाराष्ट्र व मध्यप्रदेश राज्य शासनाच्या संयुक्त समितीच्या पेंच प्रकल्पाच्या येव्याबाबतच्या अंतिम निर्णयाच्या अधिन राहील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा सांकेतांक क्र. २०२००३१९१४४२४१४८२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरी ने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

Vaishali Rajratna Kurane

Digitally signed by Vaishali Rajratna Kurane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2bcb246dbefe0ab1afab472a3a4244bbacc301c65adbfb6f57e6a45fab5aa7b8, cn=Vaishali Rajratna Kurane
Date: 2020.03.19 14:46:38 +05'30'

( वै.रा.कुरणे )
**शासनाच्या अवर सचिव**

**प्रत:**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय,
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे कार्यालय,
४) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मंबु ई
५) मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मंबु ई
६) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मंबुई याचं कार्यालय,विधानभवन, मंबु ई
७) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मंबु ई याचे कायालय, विधानभवन, मंबु ई
८) मा.मंत्री, जलसंपदा याचं खाजगी सचिव, मंत्रालय,मंबु ई,
९) मा.राज्यमंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१०) अध्यक्ष, केंद्रीय जलआयोग, नवी दिल्ली.
११) प्रधान सचिव (जलसंपदा) याचं स्वीय सहायक,जलसंपदा विभाग, मंत्रालय,मंबु ई,
१२) सचिव (जसंव्य व लाक्षवि) याचं स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मंबु ई,
१३) सचिव (प्रकल्प समन्वय) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) मा. सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, वर्ल्ड ट्रेड सेंटर,कफ परेड, मुंबई ४००००५.
१५) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.
१६) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग नागपूर.
१७) अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नागपूर
१८) कार्यासन सिंव्य(धोरण)-संग्रहार्थ.